(सोबत **"सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१५"** दिनांक ०८ जून, २०११ ची मराठी व इंग्रजी प्रत माहिती व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.)

-*-*-*-*-*-

<u>तात्काळ</u>

क्रमांक: संकीर्ण-२०१०/प्र.क्र.७१/पंरा २,
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
मादाम कामा रोड, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक: ०९ जून, २०११.

प्रति,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव

२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव

४) सर्व मंत्री /राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

५) सर्व वि.स/वि.प सदस्य

६) अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव, सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई-३२.

७) विभागीय आयुक्त (सर्व )

८) जिल्हाधिकारी (सर्व )

९) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व )

१०) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय, मुंबई

११) संचालक, भाषा संचालनालय, नवीन प्रशासकीय इमारत, बांद्रा, मुंबई-५१

१२) उपायुक्त, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई-४०० ०३२

( गजानन दा.लाभे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

RNI No. MAHBIL/2009/35530




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग चार

वर्ष ३, अंक १४ ] बुधवार, जून ८, २०११/ज्येष्ठ १८, शके १९३३ [ पृष्ठे ४, किंमत : रुपये २०.००

असाधारण क्रमांक ४६

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**

अनुक्रमणिका



**ग्रामविकास व जलसंधारण विभाग**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक ८ जून २०११.

**MAHARASHTRA ORDINANCE No. XV OF 2011.**

AN ORDINANCE

FURTHER TO AMEND THE BOMBAY VILLAGE PANCHAYATS ACT, 1958.

**सन २०११ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १५.**

**मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यात आणखी सुधारणा करण्यासाठी अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधान मंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांसाठी, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ यात आणखी सुधारणा करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ; (१९५९ चा मुंबई ३.)

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :—

संक्षिप्त नाव व प्रारंभ.

**१.** (१) या अध्यादेशास, मुंबई ग्रामपंचायत (सुधारणा) अध्यादेश, २०११ असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १०-१क ची सुधारणा.

२. मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (यात यापुढे ज्याचा निर्देश " मुख्य अधिनियम " असा करण्यात आला आहे), याच्या कलम १०-१क मधील, विद्यमान परंतुकांऐवजी, पुढील परंतुके दाखल करण्यात येतील :— १९५९ चा मुंबई ३.

" परंतु, राज्य निवडणूक आयोगाने जाहीर केलेल्या निवडणूक कार्यक्रमानुसार सार्वत्रिक किंवा पोट-निवडणुकांकरिता नामनिर्देशनपत्र भरण्याचा शेवटचा दिनांक ३१ डिसेंबर २०११ हा किंवा त्यापूर्वीचा असेल, मात्र, जिने नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकापूर्वी, आपल्या जातीच्या प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी पडताळणी समितीकडे अर्ज केलेला असेल, परंतु जिला नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकाला वैधता प्रमाणपत्र मिळालेले नसेल अशी व्यक्ती, नामनिर्देशनपत्रासोबत,—

(एक) वैधता प्रमाणपत्र देण्यासाठी तिने पडताळणी समितीकडे सादर केलेल्या अर्जाची सत्य प्रत किंवा पडताळणी समितीकडे तिने असा अर्ज केला असल्याबद्दलचा अन्य कोणताही पुरावा ; आणि

(दोन) ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत, पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र ती सादर करील याबद्दलचे हमीपत्र,

सादर करील :

परंतु आणखी असे की, त्या व्यक्तीने, ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत वैधता प्रमाणपत्र सादर करण्यात कसूर केल्यास, तिची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्द झाली असल्याचे मानण्यात येईल आणि ती, सदस्य राहण्यास निरर्ह ठरेल. ".

सन १९५९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम ३०-१क ची सुधारणा.

**३.** मुख्य अधिनियमाच्या कलम ३०-१क मधील, विद्यमान परंतुकांऐवजी, पुढील परंतुके दाखल करण्यात येतील :—

" परंतु, राज्य निवडणूक आयोगाने जाहीर केलेल्या निवडणूक कार्यक्रमानुसार सार्वत्रिक किंवा पोट-निवडणुकांकरिता, नामनिर्देशनपत्र भरण्याचा शेवटचा दिनांक ३१ डिसेंबर २०११ हा किंवा त्यापूर्वीचा असेल, मात्र, जिने नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकापूर्वी, आपल्या जातीच्या प्रमाणपत्राच्या पडताळणीसाठी पडताळणी समितीकडे अर्ज केलेला असेल, परंतु

जिला नामनिर्देशनपत्र भरण्याच्या दिनांकाला वैधता प्रमाणपत्र मिळालेले नसेल अशी व्यक्ती, नामनिर्देशनपत्रासोबत,—

(एक) वैधता प्रमाणपत्र देण्यासाठी तिने पडताळणी समितीकडे सादर केलेल्या अर्जाची सत्य प्रत किंवा पडताळणी समितीकडे तिने असा अर्ज केला असल्याबद्दलचा अन्य कोणताही पुरावा ; आणि

(दोन) ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत, पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र ती सादर करील याबद्दलचे हमीपत्र,

सादर करील :

परंतु आणखी असे की, त्या व्यक्तीने, ती निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या मुदतीत वैधता प्रमाणपत्र सादर करण्यात कसूर केल्यास, तिची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्द झाली असल्याचे मानण्यात येईल आणि ती, सरपंच राहण्यास निरर्ह ठरेल. ”.

## निवेदन

मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ (१९५९ चा मुंबई ३) याच्या कलम १०-१क मध्ये अशी तरतूद आहे की, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती किंवा, यथास्थिति, नागरिकांचा मागासवर्ग यांच्याकरिता राखीव असलेल्या जागेसाठी निवडणूक लढविण्यास इच्छुक असलेली प्रत्येक व्यक्ती नामनिर्देशनपत्राबरोबर महाराष्ट्र अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग व विशेष मागासप्रवर्ग (जातीचे प्रमाणपत्र देण्याचे व त्याच्या पडताळणीचे विनियमन) अधिनियम, २००० (२००१ चा महा. २३) च्या तरतुदींना अनुसरून, सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले जातीचे प्रमाणपत्र व पडताळणी समितीने दिलेले वैधता प्रमाणपत्र सादर करील.

२. राज्यातील सुमारे १,५६५ ग्रामपंचायतींच्या निवडणुका जून २०११ ते डिसेंबर २०११ या महिन्यांमध्ये घेतल्या जात असून, या निवडणुका घेण्यासंबंधातील प्रारंभिक कामकाज यापूर्वीच सुरु झाले आहे. इयत्ता अकरावी, बारावी व विविध व्यावसायिक पाठ्यक्रमांची प्रवेश प्रक्रिया विचारात घेता, जात पडताळणी समित्यांवर अगोदरच कामाचा अधिक भार पडलेला असून, या समित्यांना, ऑक्टोबर २०११ पर्यंत विद्यार्थ्यांच्या अर्जांची पडताळणी करण्याचे काम अग्रक्रमाने हाती घ्यावे लागेल. यामुळे, जात पडताळणी समित्यांकडून जात वैधता प्रमाणपत्र मिळण्यामध्ये अडचणी निर्माण झाल्या आहेत.

३. जात पडताळणी समित्यांवर पडताळणीच्या कामाचा अधिक भार असल्याने, या समित्यांकडून केवळ जात वैधता प्रमाणपत्र वेळेत न दिल्यामुळे उमेदवारांना, राखीव असलेल्या पदांसाठी निवडणूक लढविण्याच्या संधीपासून वंचित ठेवले जाईल अशी प्रतिवेदने जनतेकडून व संभाव्य उमेदवारांकडून मिळाल्यामुळे, शासनाला, राखीव जागांसाठी निवडणुका लढविण्यास इच्छुक असलेल्या आणि नामनिर्देशनपत्र भरतेवेळी जात वैधता प्रमाणपत्र मिळण्यासाठी जात पडताळणी समितीकडे अर्ज केलेल्या व्यक्तींना ते निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या आत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याची परवानगी देण्याच्या दृष्टीने, मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ मध्ये सुधारणा करणे इष्ट वाटते. तसेच, शासनाला, राखीव असलेल्या पदावर निवडून आलेल्या सरपंचांस ते निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून चार महिन्यांच्या आत वैधता प्रमाणपत्र सादर करण्याची परवानगी देण्यासाठी उक्त अधिनियमाच्या कलम ३०-१क मध्ये सुधारणा करणे इष्ट वाटते.

४. राज्य विधानमंडळाच्या दोन्हीं सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांसाठी, मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८ मध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता महाराष्ट्राच्या राज्यपालांनी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे, म्हणून, हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

**के. शंकरनारायणन्,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

मुंबई,
दिनांक ७ जून २०११.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**सुधीर ठाकरे,**
शासनाचे सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

RNI No. MAHENG/2009/35528




# महाराष्ट्र शासन राजपत्र

# असाधारण भाग आठ

वर्ष ३, अंक २०] बुधवार, जून ८, २०११/ज्येष्ठ १८, शके १९३३ [ पृष्ठे ४, किंमत : रुपये १४.००

## असाधारण क्रमांक ६५

## प्राधिकृत प्रकाशन

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).**

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XV of 2011), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

[Translation in English of the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2011 (Mah. Ord. XV of 2011), published under the authority of the Governor.]

## RURAL DEVELOPMENT AND WATER CONSERVATION DEPARTMENT

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 8th June 2011.

## MAHARASHTRA ORDINANCE No. XV OF 2011.

*AN ORDINANCE*

*further to amend the Bombay Village Panchayats Act, 1958.*

WHEREAS both Houses of the State Legislature are not in session;

AND WHEREAS the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Village Panchayats Act, 1958, for the purposes hereinafter appearing; Bom. III of 1959.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (*1*) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely:—

Short title and commencement.

1. (*1*) This Ordinance may be called the Bombay Village Panchayats (Amendment) Ordinance, 2011.

(2) It shall come into force at once.

Amendment of section 10-1A of Bom. III of 1959.

**2.** In section 10-1A of the Bombay Village Panchayats Act, 1958 (hereinafter referred to as "the principal Act"), for the existing provisos, the following provisos shall be substituted, namely :— Bom. III of 1959.

" Provided that, for the General or by-elections for which the last date of filing of nomination falls on or before the 31st December 2011, in accordance with the election programme declared by the State Election Commission, a person who has applied to the Scrutiny Committee for verification of his Caste Certificate before the date of filing of the nomination papers but who has not received the Validity Certificate on the date of filing of the nomination papers shall submit, alongwith the nomination papers,—

(*i*) a true copy of the application preferred by him to the Scrutiny Committee for issuance of the Validity Certificate or any other proof of having made such application to the Scrutiny Committee ; and

(*ii*) an undertaking that he shall submit, within a period of four months from the date on which he is declared elected, the Validity Certificate issued by the Scrutiny Committee :

Provided further that, if the person fails to produce the Validity Certificate within a period of four months from the date on which he is declared elected, his election shall be deemed to have been terminated retrospectively and he shall be disqualified for being a member.".

Amendment of section 30-1A of Bom. III of 1959.

**3.** In section 30-1A of the principal Act, for the existing provisos, the following provisos shall be substituted, namely :—

" Provided that, for the General or by-elections for which the last date of filing of nomination falls on or before the 31st December 2011, in accordance with the election programme declared by the State Election Commission, a person who has applied to the Scrutiny Committee for verification of his Caste Certificate before the date of filing of the nomination papers but who has not received the Validity Certificate on the date of filing of the nomination papers shall submit, alongwith the nomination papers,—

(*i*) a true copy of the application preferred by him to the Scrutiny Committee for issuance of the Validity Certificate or any other proof of having made such application to the Scrutiny Committee ; and

(*ii*) an undertaking that he shall submit within a period of four months from the date on which he is declared elected, the Validity Certificate issued by the Scrutiny Committee :

Provided further that, if the person fails to produce the Validity Certificate within a period of four months from the date on which he is declared elected, his election shall be deemed to have been terminated retrospectively and he shall be disqualified for being a *Sarpanch*.".

STATEMENT

Section 10-1A of the Bombay Village Panchayats Act, 1958 (Bom. III of 1959) provides that, every person desirous of contesting election to a seat reserved for persons belonging to Scheduled Castes, Scheduled Tribes or, as the case may be, Backward Classes of Citizens, shall submit, along-with the nomination papers, Caste Certificate issued by the Competent Authority and the Validity Certificate issued by the Scrutiny Committee in accordance with the provisions of the Maharashtra Scheduled Castes, Scheduled Tribes, De-notified Tribes (*Vimukta Jatis*), Nomadic Tribes, Other Backward Classes and Special Backward Category (Regulation of Issuance and Verification of) Caste Certificate Act, 2000 (Mah. XXIII of 2001).

2. The elections of approximately 1,565 *Gram Panchayats* in the State are scheduled in the months from June 2011 to December 2011 and the preliminary work for the holding those elections has already commenced. Taking into consideration the admission process to Standards XI, XII and various professional courses, the Caste Scrutiny Committees which are already overburdened, will have to undertake on priority, the work of scrutiny of the applications for the students till October 2011. This has resulted in difficulties in obtaining the Caste Validity Certificate from the Caste Scrutiny Committees.

3. On receiving the number of representations from the public and prospective candidates that they will be deprived of the opportunity to contest the election for the reserved posts merely because of the non-issuance of the Caste Validity Certificate by the Caste Scrutiny Committee in time, as the Committees are otherwise overburdened with the verification work, the Government considers it expedient to amend the Bombay Village Panchayats Act, 1958, with view to allow the persons desirous of contesting election for reserved seats and who have applied to the Caste Scrutiny Committee for obtaining Caste Validity Certificate at the time of filing the nomination, to submit the Caste Validity Certificate within four months from the date on which they are declared elected. Similarly, the Government considers it expedient to amend section 30-1A of the said Act to allow *Sarpanchas* elected against the reserved post, to submit the Validity Certificate within four months from the date on which they are declared elected.

4. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Bombay Village Panchayats Act, 1958, for the purposes aforesaid, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 7th June 2011.

K. SANKARANARAYANAN,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

SUDHIR THAKARE,
Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21 A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI